परभणी जिल्ह्यातील पुर्णा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र. ४५ /नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ११ मार्च, २०२२.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र.मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो-०१-२१/१९१, दि.१४/०१/२०२१.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधिन पत्रान्वये परभणी जिल्ह्यातील पुर्णा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, परभणी यांनी सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, परभणी यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, परभणी यांचा ठराव विचारात घेऊन परभणी जिल्ह्यातील पुर्णा तालुक्यातील खालील रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | कावलगांव ते आलेगांव रस्ता | ०/०० ते २/५०० | २.५००कि.मी. | ग्रामीण मार्ग- ९३ |
| २. | कावलगांव ते कारखाना फाटा रस्ता | ०/०० ते ६/०० | ६.००कि.मी. | ग्रामीण मार्ग-९४ |
| ३. | कावलगांव ते नांदेड जिल्हा सरहद्द रस्ता | ०/०० ते ३/५०० | ३.५००कि.मी. | ग्रामीण मार्ग-९५ |
| ४. | धानोरा ते पेनूर रस्ता | ०/०० ते २/०० | २.००कि.मी. | ग्रामीण मार्ग- ९६ |
| | एकूण | | १४.०० कि.मी. | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील परभणी जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **१४.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२८८२.७४० +१४.००) म्हणजेच **२८९६.७४० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०३१४१५०६५१३४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2022.03.14 15:10:28 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, परभणी.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.